जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-१ संवर्गातील अधिकाऱ्यांची कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश, क्रमांकः एसएलएस ११२१/प्र.क्र. २६८/भाग-४/२०२१/आ (वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : १७ जुलै, २०२३.

**संदर्भ** :- १) शासन आदेश, जलसंपदा विभाग, समक्रमांक, दिनांक ३१.०३.२०२३

**शासन आदेश** :-

दिनांक ३१.०३.२०२३ च्या संदर्भाधीन आदेशान्वये जलसंपदा विभागातील सहायक अभियंता श्रेणी-१ (वेतनश्रेणी- एस-२०, रुपये ५६१००-१७७५००) संवर्गातील २९ अधिकाऱ्यांना कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर एस-२३, रुपये ६७७००-२०८७०० या वेतनश्रेणीमध्ये उप विभागीय अभियंता संवर्गाच्या कोट्यामध्ये उपलब्ध असलेल्या कार्यकारी अभियंता पदावर विहित अटींच्या अधीन राहून निव्वळ तदर्थ स्वरुपात पदोन्नती देण्यात आली आहे. सदर आदेशामधील अ.क्र. ४, १३ व १८ येथील अधिकाऱ्यांचे पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील असे आदेशात नमूद करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन खालील अधिकाऱ्यांची प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने या विभागातील रिक्त पदांवर पुढे दर्शविल्यानुसार पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | पदोन्नतीने पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ |
| १. | श्री.वैभव शांताराम भागवत | सहायक अभियंता श्रेणी-१, लघु पाटबंधारे बांधकाम उपविभाग, शिरपुर. | कार्यकारी अभियंता, पालखेड पाटबंधारे विभाग, नाशिक. |
| २. | श्री.निलेश प्रकाश पाटील | सहायक अभियंता श्रेणी-१, पाटबंधारे उपविभाग क्र.१,धुळे. | कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, नाशिक. |

२. वरील परिच्छेदामध्ये नमूद केलेल्या अ.क्र. ४ येथील श्री.वरुण तुकाराम मोटे यांच्या पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांबाबत दिनांक ३१.०३.२०२३ च्या पदोन्नतीच्या आदेशातील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद केलेल्या अटी जशाच्या तशा लागू राहतील.

४. सदर पदोन्नती, मा. उच्च न्यायालय, मुंबई मधील रिट याचिका क्र. २७९७/२०१५ मध्ये दिनांक ४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील मा.सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

५. सदर पदोन्नती, मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट पिटीशन क्र. ३९७१/२०१० व रिट पिटीशन क्र. ४२८४/२०१०, सिव्हील ॲप्लीकेशन क्र. ९१६०/२०१०, सिव्हील ॲप्लीकेशन क्र. १२१२२/२०१७ व सिव्हील ॲप्लीकेशन क्र. ४०६८/२०१९ आणि त्यामध्ये दाखल केलेल्या अवमान याचिका क्र. ३८७/२०२०, तसेच मा.उच्च न्यायालय, मुंबई मधील रिट याचिका क्र. ९८५०/२०१४, मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र. ४०९/२०२०, मूळ अर्ज क्र. ४६१/२०२० व मूळ अर्ज क्र. ६७६/२०२० आणि मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र. ६९१/२०२२ यामध्ये, तसेच पदोन्नती संदर्भात मा.न्यायालय/ न्यायाधिकरण यामध्ये प्रलंबित असणाऱ्या इतर याचिकांमधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

६. सदर पदोन्नती मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल करण्यात आलेल्या रिट याचिका क्र. १०८७६/२०२१ व रिट याचिका (स्टॅम्प) क्र. १०८७८/२०२१, तसेच इतर याचिकांमध्ये होणाऱ्या अंतिम आदेशाच्या अधीन राहील.

७. पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्यापासून १ महिन्याच्या आत पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहित मुदतीत पदस्थापनेच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- एसआरव्ही १०८७/११३१/प्र.क्र.११/८९/बारा, दिनांक ३०.०४.१९९१ मधील तरतुदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक- एसआरव्ही २०१६/प्र.क्र. २८१/बारा, दिनांक २१.०६.२०२१ मधील तरतुदीनुसार सेवाज्येष्ठता निश्चित करण्याबाबत कार्यवाही करण्यात येईल, याची नोंद घ्यावी.

८. संबंधित नियंत्रक अधिका-यास कळविण्यात येते की, पदोन्नत सहायक अभियंता श्रेणी-१ यांना पदोन्नतीने नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी त्वरीत कार्यमुक्त करावे. तसेच, पदोन्नत अभियंत्यांना पदोन्नतीने नियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नियुक्तीच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttclass1.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरीत अवगत करावे.

९. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२३०७१७१४२४५७९२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. तसेच सदर आदेश जलसंपदा विभागाच्या www.wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAKHI SACHIN CHAVAN

Digitally signed by RAKHI SACHIN CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=7206b9312f3f73ff523e7a493d6d53d819f5c15336ff9a16ada11a287b879985, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=75AA5A95E2FE606BB64628D64D984EA9D651466BF93A6A2C44EEC93DF9207974, cn=RAKHI SACHIN CHAVAN
Date: 2023.07.17 14:30:37 +05'30'

**( राखी चव्हाण )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव

२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव.
३) मा. उप मुख्यमंत्री (जलसंपदा) महोदयांचे सचिव.
४) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
८) सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
९) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१०) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
११) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१२) अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई.
१३) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१४) संबंधीत अधिकारी.
१५) सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१६) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.